वस्त्रोद्योग धोरण अंतर्गत वस्त्रोद्योग घटकांना व्याज अनुदानाऐवजी भांडवली अनुदान वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: धोरण-२०२४/प्र.क्र.३८/टेक्स-५**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- ०९ एप्रिल, २०२५

<u>वाचा</u> :-

१. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र: धोरण-२०२४/प्र.क्र.३८/ टेक्स-५, दि.११ ऑक्टोबर,२०२४.
२. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र: पुनर्वि-२३२५/प्र.क्र.२३/२०२५/ १७ स, दि. ३१ मार्च, २०२५.
३. शासन शुध्दीपत्रक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र: धोरण-२०२४/प्र.क्र.३८/ टेक्स-५, दि.३१ मार्च, २०२५.

**<u>प्रस्तावना :-</u>**

वाचा क्र.१ येथील दि.११ ऑक्टोबर, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये, वस्त्रोद्योग धोरण अंतर्गत वस्त्रोद्योग घटकांना व्याज अनुदानाऐवजी भांडवली अनुदान या योजनेखाली रू.१४८६८.२३७२ लाख (अक्षरी रुपये एकशे अठ्ठेचाळीस कोटी अडूसष्ट लाख तेवीस हजार सातशे वीस फक्त) इतकी रक्कम मंजूर करण्यात आली आहे. तसेच वाचा क्र.३ येथील शासन शुध्दीपत्रक दि.३१ मार्च, २०२५ अन्वये दि.११ ऑक्टोबर, २०२४ रोजीच्या शासन निर्णयामधील परि. क्र.३, परि. क्र. ६(२) आणि परि.क्र.८ येथे सुधारणा करण्यात आली आहे. तथापि, लेखा आणि कोषागार संचालनालयाच्या (Directorate Accounts and Treasury) ऑनलाईन प्रणालीमधील तांत्रिक अडचणीमुळे दि.११ ऑक्टोबर, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूर रू.१४८६८.२३७२ लाख (अक्षरी रुपये एकशे अठ्ठेचाळीस कोटी अडूसष्ट लाख तेवीस हजार सातशे वीस फक्त) इतकी रक्कम या शासन निर्णयातील वस्त्रोद्योग घटकांना सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये वितरीत झाली नाही. सदर वाचा क्र.१ व ३ येथील शासन निर्णयाव्दारे होणारा खर्च हा आर्थिक वर्ष २०२४-२५ मध्ये अपेक्षित होता. परंतु सदर आर्थिक वर्ष संपुष्टात आल्याने

दि.११ ऑक्टोबर, २०२४ रोजीचा शासन निर्णय तसेच शासन शुध्दीपत्रक दि.३१ मार्च, २०२५ रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार याव्दारे शासन निर्णय दि.११ ऑक्टोबर, २०२४ आणि शासन शुध्दीपत्रक दि.३१ मार्च, २०२५ रद्द करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४०९१३४९०७५३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRIKRISHNA BABURAO PAWAR

Digitally signed by SHRIKRISHNA BABURAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=CO-OPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=631cf5e4544a7032340c686106b15138df3ef3b889e86fb2026c1add12d27e41, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2FAFF40BB05D156355556F7264A3A59AD12DD42F183422309976C41CE28C0A1D, cn=SHRIKRISHNA BABURAO PAWAR
Date: 2025.04.09 14:48:30 +05'30'

**( श्रीकृष्ण पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (वस्त्रोद्योग) याचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (वस्त्रोद्योग), स.प. व व.वि., मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर.
४. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
५. महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. नियोजन विभाग (कार्यासन-१४३१), मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग (व्यय-२/अर्थ-१३), मंत्रालय, मुंबई.
१०.अवर सचिव (१७-स), स.प. व व.वि., मंत्रालय, मुंबई.
११.कार्यासन अधिकारी (रोखशाखा) (३ प्रती ), स.प. व व.वि., मंत्रालय, मुंबई.
१२. परिशिष्ट अ मधील बँका (टफ सेल) (ई-मेल व्दारे).
१३. निवड नस्ती (टेक्स-५).